कृषी विभागातील कृषी आयुक्तालय व अधिनस्त कार्यालयातील गट-ब (अराजपत्रित) ते गट-ड मधील अधिकारी /कर्मचाऱ्यांच्या सरळसेवा, पदोन्नती व प्रतिनयुक्तीने नियुक्ती करण्यासंदर्भात नियुक्ती प्राधिकारी घोषित करण्याबाबत.

**महाराष्ट्रशासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः कृषिआ-१०१७/प्र.क्र.३६/१६-अे**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड, मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२
तारीख: ०६ जुलै, २०१७

वाचा- शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग क्र.एसआरव्ही २०१६/प्र.क्र.२९०/कार्या.१२ दि. १९.११.२०१६

**प्रस्तावना-**

शासकीय कर्मचाऱ्यांच्या संदर्भात सरळसेवा, पदोन्नती व प्रतिनयुक्तीने नियुक्ती करण्यासंदर्भात अंतीम निर्णय घेण्याकरिता सामान्य प्रशासन विभागाने उपरोक्त दि.१९.११.२०१६ च्या शासन निर्णयाद्वारे अखिल भारतीय सेवा, गट-अ व गट-ब (राजपत्रित) पदांचे नियुक्ती प्राधिकारी घोषित केलेले असून गट-ब (अराजपत्रित) ते गट-ड मधील पदांचे नियुक्ती प्राधिकारी घोषित करण्याबाबत संबंधित प्रशासकीय विभागांनी पदनिहाय नियुक्ती प्राधिकाऱ्यांचे पदनाम स्वतंत्र आदेशान्वये घोषित करावेत असे सूचित केलेले आहे. अनुषंगाने कृषी विभागातील कृषी आयुक्तालय व अधिनस्त कार्यालयातील गट-ब (अराजपत्रित) ते गट-ड मधील अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या सरळसेवा, पदोन्नती व प्रतिनयुक्तीने नियुक्ती करण्यासंदर्भात नियुक्ती प्राधिकारी घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

कृषी विभागातील कृषी आयुक्तालय व अधिनस्त कार्यालयातील गट-ब (अराजपत्रित) ते गट-ड मधील अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या सरळसेवा, पदोन्नती व प्रतिनयुक्तीने नियुक्ती करण्यासंदर्भात खालीलप्रमाणे नियुक्ती प्राधिकारी घोषित करण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदे | प्रस्तावित सक्षम नियुक्ती प्राधिकारी |
|---|---|---|
| १ | गट-ब (अराजपत्रित) | विभाग प्रमुख (आयुक्त) |
| २ | गट-क (राज्य संवर्ग) | विभाग प्रमुख (आयुक्त) |
| ३ | गट-क(राज्य संवर्ग वगळून) | संबंधित प्रादेशिक विभाग प्रमुख (विभागीय कृषी सहसंचालक) |
| ४ | गट-ड | संबंधित जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी |

२. प्रस्तुत शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय, क्र. एसआरव्ही २०१६/ प्र.क्र.२९०/कार्या.१२ दि. १९.११.२०१६ अन्वये प्रशासकीय विभागास देण्यात आलेल्या सुचनेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. प्रस्तुतचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०७०६१६०९२५६९०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Maroti K. Kendre

Digitally signed by Maroti K. Kendre
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And Adf, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=36815ee92192ae70f1ee64eda190b19ea66bc6407d206ab5824cb178beb840e4, cn=Maroti K. Kendre
Date: 2017.07.06 16:09:32 +05'30'

**(मा.के.केन्द्रे)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे प्रधान सचिव
२. मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.मंत्री (कृषी) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.राज्यमंत्री (कृषी) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. सर्व मा.विधानमंडळ सदस्य
६. अप्पर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. प्रधान सचिव (कृषी) यांचे स्वीय सहाय्यक, कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय मुंबई.
९. आयुक्त (कृषी), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०.संचालक (सर्व), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
११.विभागीय कृषी सहसंचालक (सर्व)
१२.जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी (सर्व)
१३.सहसंचालक (आस्थापना), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१४.निवडनस्ती (कार्यासन-१६ ए), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.